**राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान**
**राज्य ग्रंथालय नियोजन समितीची उपसमिती गठीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०२०/प्र.क्र.१९/२०२०/साशि-५,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२२.

वाचा : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.मराग्रं २०१८/प्र.क्र.१२७/२०१८/साशि-५, दि.०३.११.२०१८
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकिर्ण -२०२०/प्र.क्र.१४/२०२०/साशि -५, दि. २७.०१.२०२०
३) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३१/रा.ग्रं. नि.स./ २०१९-२०/१७०५५/ दि. २२.०१.२०२०
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मराग्रं -२०२१/प्र.क्र.१५६/२०२१/साशि -५, दि. ०२.१२.२०२१

**प्रस्तावना :-**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता या संस्थेची स्थापना भारत सरकारच्या आर्थिक सहाय्याने १९७२ साली झाली. देशातील सार्वजनिक ग्रंथालय सेवेचा सार्वत्रिक विकास करणे, हे प्रतिष्ठानचे उद्दिष्ट आहे. राज्यांमध्ये व संघराज्यांमध्ये ग्रंथालय सेवा प्रभावीपणे राबवून ती वृद्धिंगत करण्यासाठी प्रतिष्ठान, राज्यांना ५०:५० या प्रमाणात अनुरुप अनुदान देते. प्रतिष्ठानच्या या योजना राबविण्यासाठी राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या "बुक्स फोर द मेलिनीअर्स ॲट देअर डोअरस्टेप" या पुस्तकामधील मार्गदर्शक तत्त्वांनुसार सदर्भाधिन दि.०२.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य ग्रंथालय नियोजन समिती गठीत करण्यात आली आहे. राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या "ग्रंथ भेट" या योजनेंतर्गत ग्रंथ खरेदी करुन, त्याचे वितरण निवडक सार्वजनिक ग्रंथालयांना करण्यात येते. मराठी भाषेत प्रतिवर्षी प्रकाशित झालेले सर्व ग्रंथ राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या विचारार्थ ठेवण्यात येतात. या सर्व ग्रंथातून निवडक ग्रंथांची निवड करण्याचे काम सुलभपणे पार पाडण्यासाठी, राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या उपसमितीची स्थापना करण्यात येते. त्यानुसार संदर्भाधीन दि.०३.११.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या राज्य ग्रंथालय नियोजन समितीच्या उपसमिती मधील अशासकीय सदस्यांची नियुक्ती संदर्भाधिन दि.२७.०१.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आली आहे. यानुषंगाने नव्याने राज्य ग्रंथालय नियोजन समितीची उपसमिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

राजा राममोहन रॉय प्रतिष्ठान अंतर्गत राज्य ग्रंथालय नियोजन समितीची उपसमिती खालीलप्रमाणे गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे-

| | | |
|---|---|---|
| १. | ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २. | राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान यांच्या अध्यक्षांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | अध्यक्ष किंवा सचिव, महाराष्ट्र राज्य ग्रंथालय संघ | सदस्य |
| ४. | सहसचिव/उपसचिव (साशि) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५. | शासन नियुक्त सदस्य- श्री. वामन पंडीत,३९५, शांता, ब्राह्मणवाडी, मु.पो.हळवल, ता. कणकवली, जि. सिंधुदुर्ग-४१६ ६०२. | सदस्य |
| ६. | ग्रंथपाल (गट-अ), राज्य मध्यवर्ती ग्रंथालय, मुंबई | निमंत्रक तथा सदस्य सचिव |

२. सदर उपसमितीतील शासनाकडून तसेच राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानाचे अध्यक्ष यांची नामनिर्देशनाने नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांचा कार्यकाल तीन वर्ष इतका राहील. ग्रंथालय संचालकांनी विहित पध्दतीनुसार समान निधी योजनेतून शासन मान्य सार्वजनिक ग्रंथलयासाठी ग्रंथ भेट योजनेचा लाभ देण्यासाठी प्रतिष्ठानाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार ग्रंथ निवड करणे तसेच ग्रंथ खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव नियमानुसार तपासून उपसमितीस पुरेशा वेळेपूर्वी सादर करणे बंधनकारक राहिल.

३. समितीच्या अशासकीय सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिक भत्ता शासनाच्या नियमानुसार मंजूर करण्याबाबतची कार्यवाही, संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचेकडून करण्यात येईल आणि याकरीता होणारा खर्च, "मागणी क्र.डब्ल्यू-४, २२०५ कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये (०१) ग्रंथालय संचालनालय, (०१)(०१) ग्रंथालय संचालनालय, अनिवार्य (२२०५ ०२५१), ११ प्रवास खर्च", या लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१५१२१३५०२५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIL VITHALRAO SAWARE

Digitally signed by ANIL VITHALRAO SAWARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72cb8a88eb62e9fce4658097f358551a97efd88300730957d6401f7779015bcf, pseudonym=06CCFF3ECB0B3FFBAB55D9A0981C8214C023AFF2, serialNumber=1C7875BFBCCDB94828A5028954F06ED28EC75FD43053DB3AE8254FA5A5D14A57, cn=ANIL VITHALRAO SAWARE
Date: 2022.02.15 12:16:27 +05'30'

**( अनिल वि. सावरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्रशिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सह/ उपसचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग मंत्रालय, मुंबई
८) ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
११) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२) समितीचे सर्व सदस्य (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
१३) महासंचालक / संचालक, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता,
१४) ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिद्धीसाठी)
१६) निवडनस्ती (साशि-५) उच्च व तंत्रशिक्षण विभाग मंत्रालय, मुंबई.